**पुणे वन विभागांतर्गत भांबुर्डा वन परिक्षेत्रातील वारजे सर्व्हे क्र. १२० येथील वन हद्दीवर आर.सी.सी. संरक्षक भिंत बांधण्याच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१८/प्र.क्र.५२७/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २४.०९.२०१८.

**वाचा :**

अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-२४/लेखा/प्र.म./ प्र.क्र.२३/३८३/२०१८-१९, दिनांक १.८.२०१८.

**प्रस्तावना :**

राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेअंतर्गत पुणे वन विभागांतर्गत भांबुर्डा वन परिक्षेत्रातील वारजे सर्व्हे क्र. १२० येथील वन हद्दीवर आर.सी.सी. संरक्षक भिंतीचे बांधकाम करण्याकरिताच्या रु.४९,७७,५००/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास वन अभियंता, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांची तांत्रिक मान्यता घेवून सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी उपरोक्त संदर्भिय पत्रान्वये शासनास सादर केला होता व सदर प्रस्तावास मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१) पुणे वन विभागांतर्गत भांबुर्डा वन परिक्षेत्रातील वारजे सर्व्हे क्र. १२० येथील वन हद्दीवर आर.सी.सी. संरक्षक भिंतीचे बांधकाम करण्यासाठीच्या अंदाजपत्रकास खालील नमूद तपशिलाप्रमाणे तसेच अटी व शर्तीस अधीन राहून प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता प्रदान रक्कम |
|---|---|---|
| १ | **पुणे वन विभागांतर्गत भांबुर्डा वन परिक्षेत्रातील वारजे सर्व्हे क्र. १२० येथील वन हद्दीवर आर.सी.सी.** | रु.४९,७७,०००/- |
| | **एकूण** | **रु.४९,७७,०००/-** |

**अटी व शर्ती** -

अ) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

ब) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क्र.-१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

क) सविस्तर अंदाजपत्रके तयार करताना व काम सुरु करण्यापूर्वी संरक्षक भिंतीचे संकल्पन तयार करण्यात यावे व त्यास सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेवून तांत्रिक मान्यता प्रदान केल्यानंतरच निविदा कार्यवाही करण्यात यावी.

२) हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र.विअप्र.१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.०५.२००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तीका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच अनुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र.१, परिच्छेद क्र. १३४ अनुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

३) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२४१५२९२३३५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2018.09.24 15:34:06 +05'30'

**( वीरेंन्द्र तिवारी )**
अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे.
५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
६) उप वनसंरक्षक (भूमी अभिलेख), पनवेल.
७) उप वनसंरक्षक, पुणे.
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कार्यासन अधिकारी (ब-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.वि.व.व., मंत्रालय, मुंबई-३२.